सहायक अनुदानाच्या जलद संवितरण व संनियंत्रणासाठी आहरण व संवितरण अधिकारी आणि अशासकीय कार्यान्वयन प्राधिकारी यांच्याकरिता 'आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक (Virtual Personal Deposit Account Administrator) ' घोषित करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.५३/कार्यासन-६

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २८ मार्च, २०२४

**वाचा -**

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११०/२०२३/कोषा प्रशा-५,
दि. १४ फेब्रुवारी, २०२४

**प्रस्तावना -**

शासन निर्णय, वित्त विभाग, दि. १४ फेब्रुवारी, २०२४ मधील परिच्छेद ११.१ अनुसार म.को.नि. नमुना क्रमांक ४४ देयकांद्वारे २७-लहान बांधकामे, ३१-सहायक अनुदान (वेतनेतर), ३३-अर्थसहाय्य, ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान, ५०-इतर खर्च, ५३-मोठी बांधकामे आणि वित्त विभागाद्वारे वेळोवेळी घोषित करण्यात येतील अशा अन्य उद्देश शीर्ष अंतर्गत राज्याच्या एकत्रित निधीतून आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी क्षेत्रिय आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना आणि अन्य अशासकीय कार्यान्वयन प्राधिकाऱ्यांना वित्त विभागाच्या सहमतीने 'आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)' म्हणून घोषित करण्यासाठी संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग सक्षम आहेत. त्यानुसार आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना 'आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)' म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्याच्या एकत्रित निधीतून आहरित केल्या जाणाऱ्या सहायक अनुदानाच्या निधीचा विनियोग करण्यासाठी **'आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक Virtual Personal Deposit Account Administrator (VPDAA)'** म्हणून **'लेखा अधिकारी, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक'** यांना या शासन निर्णयाद्वारे घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ३८७/२४, दि. २२ मार्च, २०२४ अन्वये व महालेखापाल कार्यालयाने क्र. TM/Ch.२/UOR no २१७/L&JD/२०२३-२४/१४५८, दि. २८.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२११०२३४३१५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2024.03.28 14:45:35 +05'30'

**(विजेसिंग फ. वसावे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव
५. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व सन्माननीय विधानसभा/ विधान परिषद व संसद सदस्य, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
८. मंत्रालयीन सर्व विभागाच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.प्रधान महालेखापाल (लेखा व परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई- ४०० ००२
१५.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हिल लाईन्स, नागपूर- ४४४ ००१

१६.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१९.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२१.मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३.सर्व विभागीय आयुक्त/ सर्व जिल्हाधिकारी
२४.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७.प्रादेशिक सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण/ पुणे/ नाशिक/ छत्रपती संभाजीनगर/ अमरावती/ नागपूर
२८. संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा संचालनालय, नवी मुंबई
२९. प्रादेशिक सह संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षा, कोकण/ पुणे/ नाशिक/ छत्रपती संभाजीनगर/ अमरावती/ नागपूर
३०.वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/ पुणे/ नाशिक/ छत्रपती संभाजीनगर/ अमरावती/ नागपूर्
३१.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३२.निवडनस्ती कार्यासन-६